लेखापरीक्षक श्रेणी-१ या संवर्गातून विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था वर्ग-२ या संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१४/प्र.क्र.१४/१२-स

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० जुलै,२०१४

**वाचा :-**

१) या विभागाचा शासन निर्णय क्र.राजस-१२०७/प्र.क्र.१५२/१२-स, दि. ६.१०.२००७.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश क्र.आस्था/कक्ष-२/लेप/श्रे-१/पदो./०७,दिनांक २२.१०.२००७
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आस्था/कक्ष-२/अ-१/स.नि./पदोन्नती/१३, दिनांक १६.१२.२०१३.
४) शासनाचा समक्रमांकाचा दि.३०.०५.२०१४ चा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

श्री.डी.ए.बैसठाकूर, लेखापरीक्षक श्रेणी-१ यांना संदर्भ क्र.१ चा शासन निर्णय क्र. राजस-१२०७/प्र.क्र.१५२/१२-स, दि. ६.१०.२००७ अन्वये लेखापरीक्षक श्रेणी-१ पदावरुन विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२ या संवर्गात पदोन्नती दिलेली आहे. संदर्भ क्र.२ च्या आदेशान्वये श्री.बैसठाकूर यांना लेखापरीक्षक श्रेणी-१ या पदावरुन विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, (पणन), लातूर या पदावर पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. परंतु त्यांचे जातवैधता प्रमाणपत्र प्राप्त न झाल्याने त्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू करुन घेण्यात आले नाही. तद्नंतर श्री.बैसठाकूर यांनी विभागीय जात पडताळणी समिती, औरंगाबाद विभाग, समिती नं.२, लातूर यांचे दि.२०.११.२०१३ चे विमुक्त जातीचे वैधता प्रमाणपत्र सादर केलेले असल्याने त्यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री.डी.ए.बैसठाकूर, लेखापरीक्षक श्रेणी-१ अधिन जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-२, सहकारी संस्था (पदुम) नांदेड यांना उपरोक्त दि.६.१०.२००७ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार शासनाच्या समक्रमांकाच्या दि.३०.०५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ या पदावर विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-२, (पणन), अकोला येथील रिक्त पदी पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली होती. सद्य:स्थितीत सदरचे पद रिक्त नसल्याने आता दि.३०.०५.२०१४ च्या शासन निर्णयात अशंत: बदल करुन श्री.बैसठाकूर यांना विशेष लेखापरीक्षक,वर्ग-२ अधिन जिल्हा

विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-१, नांदेड श्री.वाळके यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अमंलात येतील असे पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१६५८०१७७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2014.07.30 16:56:29 +05'30'

**(सु.मु.धाडवे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
२. विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था, औरंगाबाद, अमरावती
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
४. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नांदेड, अकोला
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड, अकोला
६. संबंधित कर्मचारी द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. निवड नस्ती.